**कै.नरहर कुरुंदकर यांचे नांदेड येथील उभारण्यात येणा-या स्मारकाच्या दुस-या टप्प्याच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. स्मारक- ३१११/७२५/प्र.क्र.२८०/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक :- १५ मार्च, २०२४.

**वाचा:**- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक स्मारक-३१११/७२५/प्र.क्र.२८०/२९, दिनांक २०.०३.२०१३

२) शासन परिपत्रक, नियोजन विभाग, क्रमांक ससमा२०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१, दिनांक ११.६.२०१८

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनिमय (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९

४) शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्रमांक संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५.०९.२०१९

५) जिल्हाधिकारी,नांदेड यांचे पत्र.क्र.२०२२/नपाप्र/का-१/टै-२/नरहर कुरुंदकर स्मारक/ सिआर,दिनांक १७.०२.२०२२.

**प्रस्तावना:-**

कै.नरहर कुरुंदकर यांचे नांदेड येथील स्मारकाच्या टप्पा-१ च्या कामासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दिनांक २० मार्च, २०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती.

सदर टप्पा-१ च्या कामास रु.२.०० कोटी इतका निधी जिल्हाधिकारी, नांदेड यांना उपलब्ध करुन दिला आहे. टप्पा-१ चे काम पूर्ण झाल्याचे जिल्हाधिकारी, नांदेड यांनी शासनास कळविले आहे.

मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांच्या दिनांक ०९ मार्च, २०२३ रोजीच्या अर्थसंकल्पीय भाषणात कै.नरहर कुरुंदकर यांचे नांदेड येथील स्मारकास आवश्यक निधी देण्यात येईल असे घोषित केलेले होते. मा.उपमुख्यमंत्री यांनी घोषित केल्यानुसार जिल्हाधिकारी, नांदेड यांनी संदर्भाधीन क्र. ५ अन्वये कै.नरहर कुरुंदकर यांचे नांदेड येथील स्मारक उभारण्याच्या टप्पा-२ च्या कामाकरीता रु.१४७८.०० लक्ष इतक्या किंमतीचे आराखडे व अंदाजपत्रक शासनास प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केले असून, या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कै.नरहर कुरुंदकर यांचे नांदेड येथील स्मारकाच्या दुस-या टप्प्याच्या बांधकामासाठी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,नांदेड यांनी तयार व शिफारस केलेला आराखडा व अंदाजपत्रकानुसार रुपये १४७८.०० लक्ष एवढया रकमेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | उपांगाचे नांव | उपांगाची किंमत |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | अत्यावश्यक कामे (घटक ) | रु. ९,९८,०५,०३६/- |
| २ | विविध अंतर्गत कामे | रु. ५५,२४,०००/- |
| ३ | पर्यायी कामे | रु. ७५,००,०००/- |
| | **एकूण ( १+२+३)** | **रु. ११,२८,२९,०३६/-** |
| ४ | आकस्मीक (४%) | रु.४५,१३,१६१/- |
| ५ | विमा (०.५%) | रु.५,६४,१४५/- |
| ६ | जीएसटी (१२%) | रु.१,३५,३९,४८४/- |
| ७ | एक्सलेशन किंमत (१०%) | रु.१,१२,८२,९०४/- |
| ८ | ॲग्रीकल्चर चार्जेस (५%) | रु.४,९९,०२५२/- |
| | **एकूण ( ४+५+६+७+८)** | **रु.३,४८,८९,९४६/-** |
| | **एकूण ( अ.क्र.१ ते ३ + अ.क्र.४ ते ८)** | रु. /-१४,७७,१८,९८२/- |
| | **एकूण किंमत** | **रु. /-१४,७८,००,०००/-** |

**अटी व शर्थी :-**

१) स्मारक उभारताना त्याच्या देखभालीची जबाबदारी निश्चित करणे आवश्यक असून देखभाल करणारी संस्था जर अशासकीय असेल तर संस्थेशी करारपत्र करुन घेणे तसेच अशी संस्था भविष्यात देखभाल करण्यास असमर्थ ठरल्यास प्रथमत: देखभाल करण्यासाठी अन्य संस्था निश्चित करणे व त्यानंतरच पूर्वीच्या संस्थेस जबाबदारीतून मुक्त करणे याबाबतचे नियोजन करण्याबाबत जिल्हाधिकारी, नांदेड यांनी दक्षता घ्यावी.

२) स्मारकाचे बांधकाम नियोजित वेळेतच पूर्ण होईल, याबाबत जिल्हाधिकारी,नांदेड यांनी खबरदारी घ्यावी व स्मारकाच्या बांधकामाबाबतची सद्यस्थिती शासनास वेळोवळी अवगत करावी.

३) स्मारकास देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत स्मारकाचे काम पूर्ण करण्याची जिल्हाधिकारी, नांदेड यांनी दक्षता घ्यावी.

४) प्रशासकीय मान्यता दिलेल्या बाबीवरच उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च करण्यात येईल, याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

५) विस्तृत अंदाजपत्रक तयार करुनच काम हाती घेण्यात यावे.

६) स्मारकाच्या अंतर्गत पुतळे उभारावयाचे असल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक २ मे, २०१७ मधील मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्याची जिल्हाधिकारी, नांदेड यांनी दक्षता घ्यावी.

७) सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र क्र ६०/इमारती-२, दिनांक ७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

८) वित्तीय अधिकार नियमपुस्तिका "१९७८ (Manual of Financial Powers १९७८)"च्या भाग,पहिला उप विभाग पाच मधील "अनुक्रमांक १ नियम १३४ "प्रमाणे निधी वितरित करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२. या कामावर होणारा खर्च मागणी क्रमांक -ए-४, मुख्य लेखाशीर्ष, २०५९ सार्वजनिक बांधकामे ८०- सर्वसाधारण ८००- इतर खर्च (००) (००) (०३) राष्ट्रपुरूष/थोर व्यक्ती यांची स्मारके व पुतळे यांचे बांधकाम (कार्यक्रम) (२०५९ ३२०१), २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक २५ सप्टेंबर,२०१९ शासन निर्णयान्वये स्थापत्य व विद्युत असे मिळून एकूण रु. १५ कोटी रकमेपर्यंत किंमतीच्या कामांना मुख्य अभियंता यांनी (प्रस्तुत प्रकरणी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड यांनी ) तांत्रीक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार संबंधित उपभोक्ता विभागास देण्यात आलेले आहेत. शासन परिपत्रकान्वये रु. १५ कोटी पेक्षा कमी किंमतीच्या इमारतींच्या कामांना संबंधीत मुख्य अभियंता यांच्याकडून शिफारसीसह प्राप्त अंदाजपत्रकानुसार उपभोक्ता विभाग कामाची निकड व अनुदानाच्या उपलब्धतेनुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाचे अनौपचारिक निर्देश आहेत.

४. नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३४९/का.१४४३, दि.०४.१२.२०२३ अन्वये दिलेली मान्यता तसेच वित्तीय अधिकार अधिनियम पुस्तिका १९७४ मधील भाग पहिला, उप विभाग तीन, अनुक्रमांक चार, परिच्छेद क्र.२७ (२) व १३४ नुसार आणि नियोजन विभाग परिपत्रक क्रमांक ससमा २०१०/प्र क्र. ४८ (भाग-१)/ का-१४६१, दिनांक ११/६/२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१८१३१५३०२५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVINDRA RAMDAS PETKAR

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=02221e63deda18472966f6ceba0e52b81716756b206278e1f5bd437fe438c944, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=93D05A1F2A6CEAD3ED9E358A4D06E909B2A25FE9A918A443E6204CD5D72B0ED9, cn=RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2024.03.18 13:27:21 +05'30'

**( र. रा. पेटकर )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा. उप मुख्यमंत्री (गृह, विधि व न्याय, जलसंपदा व लाभक्षेत्र विकास, उर्जा, राजशिष्टाचार) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.पालकमंत्री, जिल्हा-नांदेड,
६. अपर मुख्य सचिव (प्र.सु.र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. सचिव, (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
८. जिल्हाधिकारी,नांदेड.
९. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१०. महालेखापाल -१/२ (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
१२. जिल्हा नियोजन अधिकारी,नांदेड
१३. सहसंचालक, लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,५ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
१४. निवासी उपजिल्हाधिकारी, नांदेड
१५. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड.
१६. कक्ष अधिकारी (कार्यासन व्यय- ४/अर्थसंकल्प-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. कक्ष अधिकारी (कार्या-अर्थसं (२५) /कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. कार्यासन अधिकारी (इमा-३),सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती (कार्यासन २९), सामान्य प्रशासन